मध्यम व छोट्या शहरामध्ये शासकीय जमिनीवरील अतिक्रमण नियमित करणे, अथवा सदर जमिनी भाडेपट्टयाने देऊन नियोजित शहर विकासास चालना देणे व त्यायोगे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना प्राप्त होणाऱ्या विकास निधी व मालमत्ता कराद्वारे त्यांचे उत्पन्न वाढविण्याच्या अनुषंगाने धोरण तयार करण्याकरीता समिती गठीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : एमयुएम-२०२५/प्र.क्र.११८ /नवि-१७
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ०२ एप्रिल, २०२५.

**वाचा :-**

उपसचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.संकिर्ण-२०२५/प्र.क्र.१/नवि-४, दि.२० जानेवारी, २०२५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:-**

मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.०९ जानेवारी, २०२५ रोजी आयोजित बैठकीमध्ये नगर विकास विभागांतर्गत नवि-२ उपविभागाचा १०० दिवसाच्या नियोजन आराखड्यास मान्यता प्राप्त झाली आहे. या आराखड्यात "मध्यम व छोट्या शहरामध्ये शासकीय जमिनीवरील अतिक्रमण नियमित करणे, अथवा सदर जमिनी भाडेपट्टयाने देऊन नियोजित शहर विकासास चालना देणे व त्यायोगे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना प्राप्त होणाऱ्या विकास निधी व मालमत्ता कराद्वारे त्यांचे उत्पन्न वाढविण्याच्या अनुषंगाने धोरण बनविणे" या बाबीचा समावेश करण्यात आला आहे.

२. राज्यातील महानगरपालिका, नगरपरिषदा, नगरपंचायती अंतर्गत महसूल, ग्रामविकास विभाग, नगर विकास विभाग व इतर विभागाच्या काही शासकीय मालकीच्या जमिनीवर अतिक्रमण झाल्याचे निदर्शनास येत आहे. सदर अतिक्रमण झालेल्या जागेचा अतिक्रमण धारकांकडून मालमत्ता कर भरला जात नाही. सदर मालमत्ता भाड्याने दिल्यास महानगरपालिका, नगरपरिषदा, नगरपंचायती यांच्या उत्पन्नात वाढ होऊ शकेल. याअनुषंगाने राज्यातील सर्व महानगरपालिका, नगरपरिषदा, नगरपंचायत क्षेत्रामधील शासकीय जमिनीवरील अतिक्रमण नियमीत करणे, भाडेपट्टयाने देणे, मध्यम व छोट्या शहरांमध्ये शासकीय जमिनीवरील अतिक्रमण नियमित करणे अथवा सदर जमिनी भाडेपट्ट्याने देऊन नियोजित शहर विकासास चालना देणे व त्यायोगे विकास निधी व मालमत्ता कराच्या स्वरुपात उत्पन्न वाढीच्या अनुषंगाने सर्वंकष धोरण निश्चित करण्याकरीता समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मा.मुख्यमंत्री यांनी मान्यता दिलेल्या आराखड्यातील "मध्यम व छोट्या शहरामध्ये शासकीय जमिनीवरील अतिक्रमण नियमित करणे, अथवा सदर जमिनी भाडेपट्टयाने देऊन नियोजित शहर विकासास चालना देणे व त्यायोगे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना प्राप्त होणाऱ्या विकास निधी व मालमत्ता कराद्वारे

त्यांचे उत्पन्न वाढविण्याच्या अनुषंगाने” सर्वंकष  धोरण निश्चित करण्याकरीता समिती गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२.	समितीची संरचना पुढील प्रमाणे असेल:-

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (नवि-२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव (महसूल) अथवा त्यांचे प्रतिनिधी, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण) अथवा त्यांचे प्रतिनिधी, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई. | सदस्य |
| ५ | सहसचिव (नवि-१७) , नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ६ | उपसचिव (नवि-१४),  नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ७ | उपसचिव (नवि-२०),  नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ८ | अवर सचिव (नवि-१७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

**३.	समितीची कार्यकक्षा :-**

“मध्यम व छोट्या शहरामध्ये शासकीय जमिनीवरील अतिक्रमण नियमित करणे, अथवा सदर जमिनी भाडेपट्टयाने देऊन नियोजित शहर विकासास चालना देणे व त्यायोगे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना प्राप्त होणाऱ्या विकास निधी व मालमत्ता कराद्वारे त्यांचे उत्पन्न वाढविण्याच्या अनुषंगाने सर्वंकष धोरण निश्चित करण्याच्या अनुषंगाने अभ्यास करुन अहवाल सादर करणे.

**४.	समितीचा कालावधी :-**  समितीने १५ दिवसांत अहवाल सादर करावा.

५.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०४०२१२५१३४३७२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2025.04.02 12:52:37 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (नवि-२) नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (महसूल), मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण), मंत्रालय,मुंबई.
४. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई.
५. उपसचिव (नवि-१४),  नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. उपसचिव (नवि-२०),  नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.